मंत्रिमंडळ प्रस्ताव सादर करण्यासंदर्भात
अवलंबविण्याची कार्यपध्दती.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मुख्य सचिव कार्यालय,
शासन परिपत्रक क्र.मुसका-२०१७/ई- २५४६३२१/का.१,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : ०७ सप्टेंबर, २०१७.

वाचा : १) शासन परिपत्रक, सा. प्र.विभाग/मुख्य सचिव कार्यालय, क्रमांक: मुसका-२०१४/ ई- ११०१५/२/२०१४/का.१, दिनांक १ एप्रिल, २०१४.
२) शासन निर्णय, सा.प्र.विभाग/मुख्य सचिव कार्यालय, क्रमांक: मंमंप्र-२०१४/ ई-११०१२/६/का.१, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१४.
३) शासन परिपत्रक, सा.प्र.विभाग/मुख्य सचिव कार्यालय, क्रमांक: मुसका-२०१५/ ई-१५७११०/का.१, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५.

## शासन परिपत्रक

मंत्रालयीन विभागांकडून मा.मुख्यमंत्री महोदयांच्या मान्यतेसाठी मंत्रिमंडळ प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या प्रस्तावित बैठकीपूर्वी अंतिम क्षणी विभागाकडून थेट प्राप्त होतात. त्यामुळे मुख्यमंत्री सचिवालयात विभागाच्या प्रस्तावांची तपासणी करण्यासाठी पुरेसा वेळ मिळत नाही. पर्यायाने प्रस्तावात काही त्रुटी राहिल्यास त्यासाठी पुन्हा मंत्रिमंडळापुढे प्रस्ताव सादर करावा लागतो. मंत्रिमंडळापुढे सादर करावयाच्या धारीका मंत्रिमंडळ बैठकीच्या किमान ७ दिवस अगोदर मुख्यमंत्री सचिवालयास सादर करण्याच्या सूचना वारंवार देऊनही या सूचनांचे काटेकोरपणे पालन होत नसल्याने मुख्यमंत्री महोदयांनी तीव्र नाराजी व्यक्त केली आहे.

२. मंत्रिमंडळ प्रस्ताव सत्वर सादर करण्यासंदर्भात अंमलबविण्याची कार्यपध्दती व कालमर्यादेसंदर्भात संदर्भीय (१) ते (३) येथील शासन परिपत्रक / निर्णयान्वये मंत्रालयीन सर्व विभागांना आवश्यक ते निदेश देण्यात आले आहेत. परंतु, असे निदर्शनास आले आहे की, मंत्रालयीन विभागांकडून सदर निदेशांचे पालन केले जात नाही. यास्तव, मंत्रिमंडळाच्या प्रस्तावाबाबत खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहे:-

१) मंत्रिमंडळ प्रस्ताव सादर करण्यासंदर्भात संदर्भीय (१) ते (३) येथील शासन परिपत्रक/शासन निर्णयामधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता घ्यावी.
२) मंत्रिमंडळ प्रस्तावासंदर्भातील धारिका **मंत्रिमंडळ बैठकीच्या किमान ७ दिवस आधी** मुख्यमंत्री सचिवालयाकडे प्राप्त होईल, याची सर्व मंत्रालयीन विभागांनी दक्षता घ्यावी.
३) मंत्रिमंडळ प्रस्तावासंदर्भात टिप्पणी सादर करतांना संदर्भीय (१) येथील शासन परिपत्रकासोबतच्या विहित नमुन्यात सादर करावी.
४) ज्या प्रकरणात इतर विभागांचे अभिप्राय घेण्यात येतात, त्या संबंधित विभागांचे अभिप्राय मंत्रिमंडळ टिप्पणीत नमूद करुन त्या विभागांच्या अभिप्रायावरील संबंधित प्रशासकीय विभागाचे अभिप्राय स्वतंत्रपणे नमूद करावेत.

५) आवश्यकतेनुसार संबंधित खात्याच्या मंत्री महोदयांची मान्यता घेणे आवश्यक असेल, तेथे संबंधीत मंत्री महोदयांची मान्यता घेण्यात यावी. तसेच सर्व संबंधित विभागांचे अभिप्राय घेऊन प्रस्ताव सादर करण्यात आल्याची खात्री प्रस्ताव सादर करणा-या मंत्रालयीन विभागाच्या सचिवांनी करणे आवश्यक आहे.

६) मंत्रिमंडळ निर्णयासंदर्भातील अंमलबजावणीची माहिती (कार्यवाही पूर्ण/अपूर्ण) विहित नमुन्यात सादर करण्याच्या सूचना संदर्भीय (२) येथील शासन निर्णयान्वये यापूर्वीच देण्यात आल्या आहेत. त्यानुसार मंत्रिमंडळ निर्णयाच्या अनुषंगाने केलेल्या कार्यवाहीचा विहित नमुन्यातील अहवाल या कार्यालयास विनाविलंब पाठविण्याची व्यवस्था करावी.

७) **मंत्रिमंडळाच्या टिप्पणीसोबत अनुपालनाचे टप्पे कालावधीनुसार निश्चित करण्याची विभागाने खात्री करणे आवश्यक आहे.**

३. वरील निदेशाचे कटाक्षाने पालन करुन मंत्रिमंडळ प्रस्तावासंदर्भातील धारिका सादर करण्याची जबाबदारी मंत्रालयीन विभागांच्या सचिवांची असेल. त्यामुळे कृपया त्यांनी वरील निदेशाचे पालन करण्याची दक्षता घ्यावी. याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यास विलंब झाल्यास त्याची गंभीर दखल घेण्यात येईल याची कृपया नोंद घ्यावी.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१७०९०७१७१६२१७९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sumit Mullick
Date: 2017.09.07 17:41:11 +05'30'

**(सुमीत मल्लिक)**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव / सचिव
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवड नस्ती (का.१)